सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील सोलापूर महानगरपालिकेच्या ताब्यातील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उर्दू घर बांधण्यासाठी वर्ष २०१८-१९ मध्ये अनुदान वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सोऊघ २०१४/प्र.क्र.६०(भाग-१)/का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७.१०.२०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक सोऊघ २०१४/प्र.क्र.६०/का.४, दि.०२.०५.२०१७.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

**प्रस्तावना -**

सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील सोलापूर महानगरपालिकेच्या ताब्यातील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उर्दू घर बांधण्याच्या रु.८,९७,१९,०००/- (रुपये आठ कोटी सत्याण्णव लाख एकोणीस हजार मात्र) इतक्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन, सोलापूर शहरातील उर्दू घर बांधकामासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

वरील संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकातील तरतुदीस अनसरुन, उर्दू घरासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या रु.८.०० कोटी (रुपये आठ कोटी मात्र ) इतक्या योजनांत्तर्गत अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ७०% इतक्या मर्यादेत राहून जिल्हा नियोजन अधिकारी, सोलापूर यांनी मागणी केल्यानुसार सोलापूर उर्दू घरासाठी रु.१.०० कोटी (रुपये एक कोटी मात्र) इतके अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

जिल्हा नियोजन अधिकारी, सोलापूर यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रु.१.०० कोटी (रुपये एक कोटी मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण करुन कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांना संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी शासनास सादर करावे. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांनी सदरच्या बांधकामाचे वेळापत्रक व बांधकाम पूर्ण करण्याचा नियोजित दिनांक शासनास त्वरीत कळवावा.

यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००- इतर कार्यक्रम- राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक, अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१७१३१२२३५६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Sadashiv Choukekar

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=965737dc18a2c1fbaf047c7a9f61259e5c65db981c8eaaab6c983897e5318874, serialNumber=d8e4f67b3825f197df63f949fa4b661ca6c21333d9afdb92501b830b9d0ca5c6, cn=Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2018.10.17 15:33:39 +05'30'

**(म.स.चौकेकर)**

अवर अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. आयुक्त, पुणे महसूल विभाग, पुणे,
३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी, सोलापूर,
४. आयुक्त,सोलापूर महानगरपालिका, सोलापूर,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर, जि.सोलापूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर,
८. अधीक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई,
९. स्वीय सहायक, प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. स्वीय सहायक, सह सचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. स्वीय सहायक, उप सचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. वित्त विभाग / नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.